**कंत्राटी सुरक्षा सेवेची देयके अदा करण्यास मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सुरक्षा-२०२५/ प्र.क्र.६०/ आरोग्य-४**

मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.

दिनांक : ०४ एप्रिल, २०२५

वाचा

१) शासन निर्णय ,उद्योग उर्जा व कामगार विभाग क्र.एमजीए-१५०६/प्र.क्र.९२/काम-५, दि.०८.११.२००६.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/वित्तीय सुधारणा-१, दि.०२.०२.२०१३.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११२/१३/वित्तीय सुधारणा-१, दि.०२.०२.२०१३.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पदनि-२०१०/प्र.क्र.८४/१०/वित्तीय सुधारणा-१, दि.०२.१२.२०१६.
५) सहसंचालक,आरोग्य सेवा,रुग्णालय (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र. : आसेआ/ कक्ष-३/टे-९/सुरक्षादेयक/ प्रमाणपत्र/३७५८-६०/२५, दि.०४.०३.२०२५.

**प्रस्तावना :-**

उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला यांनी अकोला, जिल्हा महिला व बाल रूग्णालय, यवतमाळ जि. यवतमाळ येथील महाराष्ट्र एक्स सर्व्हीसमन कॉर्पो लि. (मेस्को) यांनी पुरविलेल्या कंत्राटी सुरक्षा रक्षकाची सन २०२२-२३ आणि २०२३-२४ मधील माहे मे, २०२२ ते मे, २०२३ या कालावधीची देयके अनुदानाअभावी प्रलंबित असल्याने त्यास एक वर्षापेक्षा जास्त कालावधी झाल्याने देयकास मंजूरी देण्याबाबत प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला यांना जिल्हा महिला व बाल रूग्णालय, यवतमाळ जि. यवतमाळ येथील महाराष्ट्र एक्स सर्व्हीसमन कॉर्पो लि. (मेस्को) यांनी पुरविलेल्या कंत्राटी सुरक्षा रक्षकाची सन २०२२-२३ आणि २०२३-२४ मधील माहे मे २०२२ ते मे २०२३ या कालावधीच्या प्रलंबित देयकांची रक्कम रु.१३,२३,६४१/- ( अक्षरी रुपये तेरा लक्ष तेवीस हजार सहाशे एकेचाळीस फक्त ) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | रुग्णलयाचे नाव | संस्थचे नाव/ कंत्राटदाराचे नाव | खर्चाचा तपशील | प्रलंबित देयक रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रूग्णालय अंतर्गत जिल्हा महिला व बाल रूग्णालय, यवतमाळ, जि. यवतमाळ. | महाराष्ट्र एक्स सर्व्हीसमेन कॉर्पो लि. (मेस्को) | १ मे, २०२२ ते ३१ मे, २०२३ | रू. १३,२३,६४१ |
| | | | एकुण रुपये | १३,२३,६४१/- |

२. सदर प्रस्तावावरील खर्च "मागणी क्र.आर-१, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०१) (०८) प्राथमिक आरोग्य केंद्रांचा ग्रामीण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे (अनिवार्य)-, (२२१० ०४१३) (१०) कंत्राटी सेवा/ १३ - कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखालील मंजूर करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा. सदर देयके योग्य असल्याची तसेच प्रलंबित देयके दुबार अदा करण्यात आले नसल्याची खातरजमा करुनच अदायगी करण्यात यावी,याबाबतची जबाबदारी उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला यांची राहील.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक-विअप्र २०१३/ प्र.क्र.३० / २०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, अन्वये, वित्तिय अधिकार नियम पुस्तिका - १९७८ भाग - पहिला, उपविभाग-तीन मधील अ.क्र.६,नियम क्रमांक ४० अनुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०४१२०५४३७८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA PRADIP PISE

Digitally signed by KAVITA PRADIP PISE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH AND FAMILY WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=895d4dc43ba3105440c0329431446ae8333ab89578925b2d77d3806165dbd487, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AEEF37624AA6E5EA1AAA99D244C6C2A5F135097E5C07486A35D423835B4EC728, cn=KAVITA PRADIP PISE
Date: 2025.04.04 12:35:46 +05'30'

(कविता प्र. पिसे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

२. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
३. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ.
७. जिल्हा शल्य चिकित्सक,जिल्हा रुग्णालय, यवतमाळ.
८. महालेखापाल १/२,महाराष्ट्र( लेखा व लेखापरिक्षा)/लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
९. विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती ( आरोग्य-४ )